वितरण आदेश क्र.१०

“सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजनेचा निधी वितरीत करण्याबाबत”

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२३/प्र.क्र.५८/शिक्षण-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ मार्च, २०२४

**संदर्भ** :- (१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३
(२) इतर मागास बहुजन कल्याण विभागाचे शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३.०५.२०२३, दिनांक १९.०६.२०२३, दिनांक १८.०७.२०२३,दिनांक २६.०७.२०२३, दिनांक १८.०९.२०२३, दिनांक ५.१०.२०२३, दिनांक २०.११.२०२३, दिनांक ६.०२.२०२४ आणि दिनांक १५.०३.२०२४

**प्रस्तावना:-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागासवर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व फ्रीशिप करिता ३४- शिष्यवृत्ती/ विद्यावेतने उद्दिष्टांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात रु.१४३७.८५ कोटीची तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून पुरवणी मागणीद्वारे रु.११९२.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला आहे. अशा एकूण रु.२६३०.३२ कोटी निधीपैकी रु.२५७५.५३ कोटी निधी वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला आहे. त्यापैकी संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयांन्वये रु.१९४५.३८ कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे. सद्य:स्थितीत, वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून महाडिबीटी पोर्टलवरील प्रलंबित शिष्यवृत्तीचा अहवालाच्या अनुषंगाने शिष्यवृत्ती अदा करण्यासाठी निधीचे वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागासवर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व फ्रिशिप योजनेबाबत ३४- शिष्यवृत्ती व विद्यावेतन या उद्दिष्टांतर्गत प्रलंबित असलेली शिष्यवृत्ती / फ्रीशीप अदा करण्यासाठी अर्थसंकल्पीय तरतुद तसेच हिवाळी अधिवेशनात मंजूर पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधीपैकी वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या अनुषंगाने खालील विवरणपत्रात नमूद लेखाशिर्षाकरिता एकूण

रु.४७६,०५,००,०००/- (रुपये चारशे शहात्तर कोटी पाच लाख फक्त) इतका निधी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

(रु.कोटीत)

| क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत निधी + पुरवणी मागणी | विभागाने यापूर्वी वितरीत केलेली तरतूद | महा डिबीटी प्रणाली वरील मागणी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | २२२५ई८८४ | ७७३.६० | ५७८.४१ | १७२.०१ | १७३.०० |
| २ | २२२५ई९५५ | ५.०० | ४.९५ | १.१८ | ०.०५ |
| ३ | २२२५ई९४६ | १९८.६५ | १४१.६९ | ४२.७७ | ४३.०० |
| ४ | २२२५F००२ | १०९३.७७ | ७६६.८० | २५८.५५ | २६०.०० |
| **एकूण** | | **२३७८.५७** | **१४९१.८५** | **४७४.५१** | **४७६.०५** |

२. सदर योजनेकरिता संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनातून खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधिन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करतांना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

४. नियंत्रक अधिकारी यांनी निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकामधील अटींची पूर्तता झाली असल्याची खातरजमा करुन निधी वितरीत करावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३१९११५२२२५५३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHARATI DINESH DHURI

Digitally signed by BHARATI DINESH DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=ac65e55bc2f86ec37c6f25108b6605bc20e71b4742dd20d7e8f5e14cda6a2a7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6B3C122EDC26AC3532130D69CD06C9664E8A139B9A532752E240A4851A8C9D3C, cn=BHARATI DINESH DHURI
Date: 2024.03.19 12:01:39 +05'30'

**( भारती दि. धुरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
२. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. सर्व प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
९. सर्व सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवड नस्ती (शिक्षण-१)